सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात, राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना व डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत. (कार्यक्रमांतर्गत)...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मकृप-१०२२/प्र.क्र.९२/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०२३.

वाचा :- १)वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३ व दि.१६.०३.२०२३.
२) कृषि विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.१३.०५.२०२२, दि.०७.०९.२०२२, दि.०१.११.२०२२ व दि.१६.१२.२०२२.
३) संचालक (शिक्षण), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र क्रमांक मकृप/शिक्षण-१/३३९/२०२३, दि.०२.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात राज्यातील चारही कृषि विद्यापीठांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता सहायक अनुदान लेखाशिर्ष (२४१५ ११३९) (कार्यक्रम) अंतर्गत तसेच डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेकरीता सहायक अनुदान लेखाशिर्ष (२४१५ ११४८) (कार्यक्रम) अंतर्गत ३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने या उद्दीष्टाकरीता ४९ टक्क्यांच्या मर्यादेत निधी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आलेला आहे. संचालक (शिक्षण), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील, आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेसाठी रु.१६१०.०० लाख व डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेसाठी रु.३१६.०८ लाख असे एकूण रु.१९२६.०८/-लाख (अक्षरी रुपये एकोणीस कोटी सव्वीस लाख आठ हजार फक्त) इतके अनुदान खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष व उद्दीष्ट | आहरण व संवितरण अधिकारी | सन २०२२-२३ करिता अर्थसंकल्पीत तरतूद | सन २०२२-२३ वर्षात वितरीत अनुदान | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान | एकूण वितरीत अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५ | ६. | ७ (५+६) |
| | **महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे** | | | | | |
| १. | मागणी क्र. डी-३,<br>मुख्य लेखाशिर्ष '२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण,'<br>०१, पीक संवर्धन,<br>१२०, इतर संस्थाना सहाय्य,<br>(००)(२४) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता सहायक अनुदान (कार्यक्रम)<br>(२४१५ ११३९)<br>३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने | सहायक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, पुणे. | ३५००.०० | १७१५.०० | **१६१०.००** | ३३२५.०० |
| २. | मागणी क्र. डी-३,<br>मुख्य लेखाशिर्ष '२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण,'<br>०१, पीक संवर्धन,<br>१२०, इतर संस्थाना सहाय्य,<br>(००) (२५) डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेकरीता सहायक अनुदान (कार्यक्रम)<br>(२४१५ ११४८)<br>३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने | | १५००.०० | ७३५.०० | **३१६.०८** | १०५१.०८ |
| | **एकूण** | | **५०००.००** | **२४५०.००** | **१९२६.०८** | **४३७६.०८** |

२. **अटी व शर्ती:-**

१. सदरचे अनुदान चालु आर्थिक वर्षातील लाभार्थी विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीकरीता उपयोगात आणावे. सदरची रक्कम ही राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतील पात्र विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात महाडिबिटी प्रणालीद्वारे वितरीत करण्याची व्यवस्था संचालक (शिक्षण), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचेकडून करण्यात यावी.

२. योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी इतर बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३. सन २०२२-२३ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

३. परिच्छेद क्रमांक १ मधील विवरणपत्रातील स्तंभ क्र. ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत स्तंभ क्र. ६ खाली मंजूर केलेले अनुदान अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

४. या प्रित्यर्थचा खर्च परिच्छेद क्रमांक १ मधील विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ साठी मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६८/का.१४३१, दि.०९.०३.२०२३ अन्वये व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५८/२०२३/व्यय-१, दि.०२.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३२५१३४५२८३००१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2023.03.25 13:49:58 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक/संचालक (शिक्षण),महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी/ डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली/वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी/डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,

३) सहसंचालक(वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

४) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,

५) मा.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,

८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

१०) उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

११) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

१२) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

१३) अवर सचिव /कक्ष अधिकारी, कार्यासन ६अे/२अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

१४) कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.